**जामगे ता. खेड, जिल्हा रत्नागिरी येथील कोटेश्वरी मनाई तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन व संरक्षण करण्यासाठी राबविण्यात येणा-या प्रकल्पातील कामांसाठी निधी मुक्त करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१५/प्र.क्र.५१ /तां.क.३**
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २१ मार्च, २०१७

**वाचा -**

१) पर्यावरण विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय,दिनांक: २३ सप्टेंबर, २०१५
२) मुख्य कार्य अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांचे पत्र क्र.रजिप/बांधकाम/पीबी २/७७०, दिनांक १६.२.२०१६
३) पर्यावरण विभागाचे पत्र क्रमांक रासयो २०१५/प्र.क्र.५१/तां.क.३, दिनांक ९ मार्च, २०१६
४) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, चिपळूण, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांचे दिनांक रजिप/बांध/पी.बी.२/१४०२/२०१७, दिनांक १६.३.२०१७

**प्रस्तावना -**

जामगे, ता. खेड, जिल्हा रत्नागिरी येथील कोटेश्वरी मनाई तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी राज्य सरोवर संवर्धन योजना अंतर्गत दिनांक २३ सप्टेंबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये राज्य हिश्श्यापोटी रक्कम रुपये १,७१,३४,२९४/- ( रुपये एक कोटी एक्काहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त ) पैकी प्रथम हप्ता म्हणून रुपये रुपये १००.०० लक्ष एवढी रक्कम मुख्य कार्यकारी अधिकारी, रत्नागिरी जिल्हा परिषदेस अदा करण्यात आली होती. सदर बाबत संबंधितांनी उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. उपरोक्त कागदपत्राच्या आधारे तसेच एकूण खर्चाच्या अनुषंगाने जामगे ता.खेड, जिल्हा रत्नागिरी हद्दीतील कोटेश्वर मनाई येथील तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी झालेल्या खर्चास मान्यता देण्याची तसेच उर्वरित संपूर्ण निधी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. राज्य योजनेखाली राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी मार्फत सादर कोटेश्वर मनाई येथील तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २३ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयाव्दारे राज्य हिश्श्यापोटी रक्कम रुपये १,७१,३४,२९४/- (रुपये एक कोटी एक्काहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त ) पैकी प्रथम हप्ता म्हणून रुपये रुपये १००.०० लक्ष निधी वितरित करण्यात आला होता. उक्त नमूद प्रस्तावनेतील बाब लक्षात घेता मौजे जामगे येथील कोटेश्वर मनाई

तलावाच्या संवर्धनासाठी उर्वरित कामे राबविण्यासाठी अंतिम हप्ता रुपये ७१,३४,२९४/- लक्ष (रुपये एकाहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मौजे जामगे हददीतील कोटेश्वर मनाई तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी राज्य हिश्श्यापोटी देय एकूण रुपये १,७१,३४,२९४/- ( रुपये एक कोटी एक्काहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त ) एवढया रक्कमेपैकी या शासन निर्णयाव्दारे उर्वरित संपूर्ण रक्कम रुपये ७१,३४,२९४/-लक्ष ( रुपये एकाहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त ) इतकी रक्कम खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी ( Chief Executive Officer, Ratnagiri ) यांचे नांवे रुपये ७१,३४,२९४/- (रुपये एकाहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त) एवढया रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना अदा करावयाची रुपये ७१,३४,२९४/- (रुपये एकाहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. वि. गो. कडू, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. म.बा. हजारी, उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना रुपये ७१,३४,२९४/-(रुपये एकाहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाव्दारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२),पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ वर्षात अर्थसंकल्पित रु.८६०.७० लक्षच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.१६ मधील परिच्छेद क्रमांक ७(क) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, उपरोक्त परिपत्रकातील सर्व अटींची पूर्तता होत असून अनुक्रमांक १,२,५,६,७,८ करिता वित्त विभाग व नियोजन विभाग यांच्या मंजुरीची आवश्यकता नाही

७. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७२/१४७२, दिनांक ४ सप्टेंबर, २०१५ अन्वये तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्रक्र. ८९/अर्थ-३, दिनांक २७ एप्रिल, २०१६ मधील परि. क्र.७(क) अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक २०.४.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.७ ते १८ मधील प्रत्येक अटीची तसेच परिशिष्टातील अनु.क्र.३ व ९ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे.

८. याशिवाय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ अन्वये खालील बाबींची पुर्तता होत आहे.

१. विभागास प्रदान वित्तीय अधिकार, सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आलेली आहे.

२. कोटेश्वर मनाई तलावाच्या संवर्धनासाठी एकूण रुपये १,९०,३८,१०५ /- (रुपये एक कोटी नव्वद लक्ष अडतीस हजार एकशे पाच फक्त) इतक्या मंजूर रक्कमेपैकी राज्य हिश्श्यापोटी रक्कम रुपये १,७१,३४,२९४/- ( रुपये एक कोटी एक्काहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त ) निधीपैकी रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त ) एवढा निधी वितरित केला असून उर्वरित राज्य हिश्श्याचा निधीचा अंतिम हप्ता रुपये रुपये ७१,३४,२९४/- (रुपये एकाहत्तर लक्ष चौतीस हजार दोनशे चौ-याण्णव फक्त) इतका निधी प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

३. मागील तीन महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२), पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, रत्नागिरी जिल्हा परिषदेकडून पर्यावरण विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

६. तसेच परिच्छेदातील ६, ७, ८, ९ या बाबी लागू नाहीत.

९ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२१११४९४९२७०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

१०. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinayak G Kadoo

Digitally signed by Vinayak G Kadoo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=92d45ee51f2a551db32f5e6056b22f84b99bcf4c38f0bae7d3cdb71a716490ad, cn=Vinayak G Kadoo
Date: 2017.03.21 11:52:58 +05'30'

**( वि. गो. कडू )**
**कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी .
५. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, रत्नागिरी

६. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
९. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
११. प्रधानसचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१४. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती.